रा ष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमासाठी सन २०१४-१५ करीता जनजाती क्षेत्र उपयोजना (TSP) साठी केंद्र हिश्श्यापोटी रु.२७.७२ लक्ष मंजूर करणेबाबत......

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः कुनिका२०१५/निधी वितरण /प्रक्र.१७/आरोग्य-५

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख: १९ मार्च, २०१५

वाचा -

१) **सहसंचालक, आरोग्य सेवा(कुष्ठ व क्षय), पुणे यांचे पत्र क्र.ससंआसे/कुष्ठ व क्षय/कक्ष-एनएलइपी/३६६६४-६५/१४, दिनांक २४/११/२०१४**

२) **आरोग्य सेवा संचालनालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.W-११०३६/०१/२०१४/Lep/ST/१३, दि.२२/९/२०१४**

३) **आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.१०(२५)/२०१४-NRHM-I, दि.१३/१०/२०१४**

प्रस्तावना -

महाराष्ट्र राज्यात राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रम सन १९५५-५६ साली पाहणी, शिक्षण व उपचार या तत्त्वावर एक उद्देशिय पध्दतीने राबविण्यास सुरुवात झाली. सन १९८१-८२ पासून प्रभावी औषधोपचाराचा समावेश असलेली बहुविध औषधोपचार पध्दती राज्यात टप्प्याटप्प्याने लागू करण्यात येऊन १९९५-९६ सालापर्यंत राज्यातील सर्व जिल्हे या योजनेंतर्गत आणण्यात आले. या कार्यक्रमाची उद्दिष्टे पुढीलप्रमाणे :

अ) देशातील सर्व जिल्ह्यात कुष्ठरोग निर्मुलनाचे ध्येय साध्य करणे.

ब) विकृती प्रतिबंध आणि पुनर्रचनात्मक शस्त्रक्रियेद्वारे विकृती दर्जा २ चे प्रमाण कमी करणे.

२. सदर कार्यक्रमाला सन २०१३-१४ पर्यंत केंद्र शासनानकडून प्राप्त होणारा निधी परस्पर अंमलबजावणी अधिका-यांना प्राप्त होत होता. सन २०१४-१५ पासून केंद्र शासनाने निधीच्या वितरणाबाबत धोरणात्मक बदल केला असून आता केंद्र शासनाचा निधी यापुढे राज्य शासनाच्या कोषागारात जमा होणार असून सदर निधी अर्थसंकल्पित केल्यानंतर त्याचे वाटप संबंधित कार्यक्रम अंमलबजावणी अधिका-यांना करण्यात येणार आहे. या कार्यक्रमाचा राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या

अंतर्गत समावेश करण्यात आला असून केंद्र शासन आणि राज्य शासन यांचेकडील निधीचे प्रमाण ७५:२५ असे राहणार आहे. सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमांतर्गत जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत बाबींवरील खर्च भागविण्यासाठी सन २०१४-१५ या वित्तिय वर्षात सदर कार्यक्रमाकरीता केंद्र हिश्श्याची ७५% अर्थसंकल्पित केलेल्या रु.७४.८५ लक्ष इतक्या तरतूदीपैकी केंद्र हिश्श्यापोटी रु. २७.७२/- (रुपये सत्तावीस लक्ष बाहत्तर हजार फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च खालील दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर- १,

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,

०६ - आरोग्य सेवा,

७९६ - जनजाती क्षेत्र उपयोजना,

(०१) (२२) राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रम, (केंद्र हिस्सा ७५%)

(२२१० एफ़ ७८३)

३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

३. सदर अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचे देयक त्यांनी कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबीवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम संबंधीत कार्यक्रम अधिका-याकडे सुपूर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ व प्र), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. २०१३प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३ , दि. २५/४/२०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाच्या व्यय, अर्थसंकल्प व अर्थोपाय शाखेच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६७/व्यय-१४,दि. २५/२/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१९१०३७१९२८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sul Dnyandeo L

Digitally signed by Sul Dnyandeo L
DN: CN = Sul Dnyandeo L, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2015.03.20 11:30:36 +05'30'

**ज्ञा. ल. सुळ**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे.
७. प्रशासकीय अधिकारी(आहरण व संवितरण अधिकारी),आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०.नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई.
११.वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२.वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१३.सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई.
१४.सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१५.निवड नस्ती (आरोग्य-५).